(८)

शासकीय कर्मचा-याचे सार्वजनिक उपक्रमांत/
स्वायत्त्ता संस्था यात कायमचे समावेशन झाल्या-
नंतर कुटुंब निवृत्तिवेतनाच्या अनुज्ञेयतेबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:सेनिवे-1090/146/सेवा-2,
मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 31 मे 1994.

पहा:- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: पीइएन-1080/सीआर-210/सेवा-4, दिनांक 28 एप्रिल 1981.

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: पीइएन-1080/सीआर-210/सेवा-4, दिनांक 28 एप्रिल 1981 च्या परिच्छेद - 7 मध्ये अशी तरतुद करण्यात आली आहे की, जर सार्वजनिक उपक्रमांत कुटुंबनिवृत्तिवेतन योजना अंमलात नसेल तरच कायमचे समावेशन झालेल्या शासकीय कर्मचा-यास राज्य शासनाच्या कुटुंबनिवृत्तिवेतन योजनेचे फायदे अनुज्ञेय राहतील.

2. शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: पीइएन-1080/सीआर-210/सेवा-4, दिनांक 28 एप्रिल 1981 च्या परिच्छेद - 7 मध्ये अंशत: बदल करुन कुटुंबनिवृत्तिवेतनाचे फायदे कायमचे समावेशन झालेल्या शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत पुढे दिल्याप्रमाणे नियमित करण्यात यावेत.

(1) कायमचे समावेशन झालेल्या शासकीय कर्मचा-यास राज्य शासनाची कुटुंबनिवृत्तिवेतन योजना अथवा सार्वजनिक उपक्रम/स्वायत्त संस्थेची कुटुंबनिवृत्तिवेतन योजना यापैकी फक्त कोणतीही एक योजना लागू होण्याचा विकल्प देता येईल. दोन्हीचा नव्हे. तथापि, जो शासकीय कर्मचारी त्याच्या कायमचे समावेशनाच्या वेळी स्थायी आहे आणि ज्याची 10 वर्षाहून कमी नाही एवढी अर्हताकारी सेवा झालेली आहे, अशाच कर्मचा-यास राज्य शासनाच्या कुटुंबनिवृत्तिवेतन योजनेचा फायदा उपलब्ध राहील.

(2) या संबंधातील राज्य शासनाचे दायित्व ज्या दिनांकाला शासकीय कर्मचा-याचे कायमचे समावेशन झालेले आहे त्या दिनांकापासून संपुष्टात येईल. म्हणजेच, कुटुंबनिवृत्तिवेतनाची परिगणना ज्या दिनांकास शासकीय कर्मचा-याचे कायमचे समावेशन झालेले असेल, त्या दिनांकास घेतलेले वेतन व अंमलात असलेल्या नियमानुसार करण्यात येईल.

3. कायमचे समावेशन झालेले जे शासकीय कर्मचारी राज्य शासनाच्या कुटुंबनिवृत्तिवेतन योजनेचा विकल्प देतील, त्यांना, आवश्यकतेप्रमाणे कर्मचारी भविष्यनिर्वाह निधी व संकीर्ण तरतुदी अधिनियम, 1952 च्या कलम 17 च्या उपखंड (1-क) खाली, कर्मचारी कुटुंबनिवृत्तिवेतन योजना 1971 च्या तरतुदींपासून सुट प्राप्त करुन घ्यावी लागेल. त्यासाठी संबंधित कर्मचा-यांनी केंद्रीय भविष्य निर्वाह आयुक्तांकडे त्यांच्या नियुक्त्या मार्फत म्हणजेच संबंधित सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम/स्वायत्त संस्था यांचेमार्फत औपचारिकरित्या अर्ज सादर करावा.

4. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: पीइएन-1080/सीआर-210/सेवा-4, दिनांक 28 एप्रिल 1981 मध्ये विहित केलेल्या ज्या इतर अटी व शर्ती त्या शासन निर्णयानुसार विनिर्देशपूर्वक बदलण्यात आल्या नाहीत त्या तशाच लागू राहतील.

5. हे आदेश शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील. ज्या शासकीय कर्मचाऱ्यांचे सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांत/स्वायत्त संस्थांत कायमचे समावेशन झालेले आहे, आणि जे या तारखेपर्यन्त सेवेत आहेत, ते राज्य शासनाची कुटुंबनिवृत्तिवेतन योजना लागू करण्याबाबतचा विकल्प देण्यास पात्र राहतील. असा विकल्प संबंधितांनी हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून 6 महिन्यांच्या आत देणे आवश्यक आहे. एकदा दिलेला विकल्प अंतिम राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[illegible],
शासनाचे अवर सचिव.

प्रति

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई (80 प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई (80 प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर (40 प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर (40 प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (40 प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (5 प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथपाल 5 प्रती),
निवड नस्ती, कार्यासन सेवा - 2.

---

*पत्राने.

एच-541(13,000+40-5-94)-1अ

Permanent transfer of Government servants to the Public Sector undertakings, entitlement to family pension.

GOVERNMENT OF MAHARASHTRA
Finance Department,
Resolution No.PEN-1090/CR-146/SER-2,
Mantralaya, Bombay 499 032.
Dated the 31st May 1994.

READ:- Government Resolution, Finance Department, No.PEN-1980/CR-210/SER-4, dated the 28th April 1981.

RESOLUTION:- Para 7 of Government Resolution, Finance Department, No.PEN-1080/CR-210/SER-4, dated the 28th april 1981, interalia, provides that the absorbed employees would be eligible for the benefits under the State Government Family Pension Scheme, only if a family pension scheme is not in operation in the Public Sector Undertakings:

2. Government is now pleased to decide that in partial modification of para 7 of the Government Resolution, Finance Department, No.PEN-1080/CR-210/SER-4, dated the 28th April 1981, the family pension entitlements of the absorbed employees will be regulated as under:-

(i) The absorbed employees shall have an option to be governed either by the Family Pension Scheme of the State Government or by that of the Public Sector Undertakings/autonomous bodies, but not both. However, the benefit of Family Pension Scheme of the State Government will be available only to such of the absorbed employees who are permanent and have a qualifying service of not less than 10 years; and

(ii) The liability of the State Government in this regard will be frozen as on the date of permanent absorption of the individual employees, that is to say, the amount of family pension payable will be calculated with reference to the pay drawn and the rules in force, on the date of permanent absorption.

H-541(13,000+40-5-94)-2

3. The employees who opt for the family pension scheme of the State Governemnt will have to seek the exemption from the operation of the provisions of the Employee's Family Pension Scheme 1971 under Section 17(1C) of the Employee's Provident Fund and Miscellaneous Provilons Act, 1952, wherever necessary. For this purpose, the concerned employees should submit a formal application for exemption to the Central Provident Fund Commissioner through their employers, i.e. the concerned Public Sector Undertaking/ Autonomous Bodies.

4. The other terms and conditions stipulated in Government Resolution, Finance Department, No.PEN-1080/CR-210/SER-4, dated the 28th April 1981 which have not been specifically modified by this resolution will continue to be operative.

5. These orders take effect from the date of issue. The State Government employees absorbed in Public Sector Undertakings/Autonomous Bodies and who are in service on this date will be eligible to exercise the option for being governed by the Family Pension Scheme of the State Government. This option shall be exercised within a period of six months from the date of issue of this resolution. The option once exercised shall be final.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

S.S. BASANAK,
Under Secretary to Government.

To

The Accountant General, Maharashtra I, Bombay.
The Accountant General, Maharashtra II, Nagpur.
The Pay and Accounts Officer, Bombay.
The Resident Audit Officer, Bombay.
The Chief Auditor, Local Fund Accounts, Bombay.
The Secretary to Governor.
The Secretary to Chief Minister.
All Personal Assistants to the Ministers and Ministers for State.
* The Prothonotary and Senior Master, High Court, Bombay.
* The Registrar, High Court, Appellate Side, Bombay.
* The Secretary, Maharashtra Public Service Commission, Bombay.
* The Registrar, Office of the Lokayukta and Upa-Lokayukta, Bombay.
All Departments of the Mantralaya.
All Heads of Departments and Offices under the various Departments of the Mantralaya.
All Chief Executive Officers of Zilla Parishads.
All Desks in Finance Department.
Select File, Desk SER-2, Finance Department.

*By letter.

No. of 1994.

Copy forwarded for information and guidance to -